तालुका बिलोली जिल्हा नांदेड येथील अटकाळी या पुनर्वसित गावामधील अंतर्गत रस्ते (सी. सी. रस्ते) या नागरी सुविधेच्या कामाला प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग
शासन निर्णय क्रमांक - एफएलडी-२०२३/प्र.क.०२(१)/र-१२
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक- ०४ मे, २०२३

वाचा:-

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. सीएफएल ५९८९/प्र.क्र.२१७/म-३, दि.०१.०८.१९८९
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. सीएफएल ५९८९/प्र.क्र.२१७/म-३, दि.१५.०२.१९९०
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.आरपीए २००८/प्र.क्र.५५०/र-१, दि.०१-०८-२००९
४) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. ०१११/प्र.क्र.१८/र-१, दि.२८-०३-२०११
५) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२,दि.१७-०४-२०१५
६) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.विअप्र २०१५/प्र.क्र.२०/२०१५/विनियम, दि.१९-०१-२०१६
७) शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्र. विअसु २०१५/प्र.क्र.२१८/इमारती-२,दि.१६-१२-२०१५
८) जिल्हाधिकारी, नांदेड यांचे पत्र क्र. २०२२/उपजिपु/पु.पु./टे-१/सीआर/१७०४, दि.२०-०१-२०२३

प्रस्तावना:-

सन १९८३ मध्ये झालेल्या अतिवृष्टीने बाधित झालेल्या गांवाच्या पुनर्वसनास संदर्भ क्रमांक १ नूसार मान्यता देण्यात आलेली आहे. त्यानूसार जिल्हाधिकारी नांदेड यांनी संदर्भ क्र.८ अन्वये तालुका बिलोली येथील अटकळी गावामधील अंतर्गत रस्ते (सी. सी. रस्ते) या नागरी सुविधा कामांना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याचा प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:-

**नांदेड जिल्हयातील** तालुका बिलोली येथील अटकळी या गावामधील अंतर्गत रस्ते (सी. सी. रस्ते) या नागरी सुविधा कामांच्या एकूण रु.११०.००/-लक्ष (**अक्षरी एक कोटी दहा लक्ष फक्त**) इतक्या रक्कमेच्या खालील अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

(रुपये लाखात)

| अ. क्र. | पूरबाधित गावाचे नाव | तालुका | नागरी सुविधा काम | अंदाजपत्रकीय रक्कम |
|---|---|---|---|---|
| १ | मौजे अटकळी (११ कामे) | ता. बिलोली | अंतर्गत रस्ते (सी. सी. रस्ते) | ११०.०० |

अटी व शर्ती :-

१) नागरी सुविधा कामे करताना प्रस्तुत प्रस्तावित समाविष्ट असलेले गौण खनिज स्वामीत्वधनाची वसूली करण्याची जबाबदारी संबंधित कार्यान्वयीन यंत्रणेची राहील.

२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. जीटीएन १०८३ /२१७/र-१२, दि.१०-०२-१९८३, शासन निर्णय क्र. आरसीपीए २००८/प्र.क्र.५५०/र-१, दि.१-०८-२००९ व शासन परिपत्रक क्र. आरपीए ०१११/ प्र.क्र.१८/र-१, दि.२८-०३-२०११ अन्वये पुनर्वसित/ विस्तारित गावठाणातील नागरी सुविधा

पुरविण्यासाठी निर्धारित करण्यात आलेल्या भौतिक मानकांनुसार काम करुन घेण्याची जबाबदारी संबंधित कार्यकारी अभियंता यांची राहील.

३) प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांवर होणारा खर्च मंजूर अंदाजपत्रकांतील रकमेपेक्षा विहित मर्यादेपेक्षा अधिक होणार नाही, याची संबंधित अधिक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांनी योग्य ती दक्षता घ्यावी.

४) प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांसाठीच्या अंदाजपत्रकांत दर्शविलेली कामनिहाय रक्कम तांत्रिक व प्रशासकीय मान्यतेतील अटींचे विहित कार्यपध्दतीनुसार पालन होईल, याची संबंधित कार्यान्वयन यंत्रणेच्या संबंधित अधिक्षक अभियंता व संबधित कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

५) संबंधित कार्यकारी अभियंता यांनी प्रस्तावाधीन नागरी सुविधा सर्व दृष्टीने पूर्ण झाल्यावर व त्याप्रमाणे जिल्हाधिकारी, नांदेड यांचेकडून प्रमाणपत्र घेतल्यानंतर संबंधित जिल्हा परिषदेकडे हस्तांतरित कराव्यात व तत्संबंधात जिल्हाधिकारी, नांदेड यांचेमार्फत शासनाच्या पुनर्वसन विभागास अवगत करावे.

६) महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम विभाग कार्यनियमावलीतील प्रचलित नियमांनुसार सदर नागरी सुविधा कामांच्या अंदाजपत्रकांस संबंधित कार्यान्वयन यंत्रणेच्या अधिक्षक अभियंता / कार्यकारी अभियंता यांनी तांत्रिक मान्यता प्रदान केलेली असावी.

७) पुनर्वसन योजनेतून पुरविण्यात आलेल्या नागरी सुविधा अन्य योजनेतून पुनश्च: पुरविल्या जाणार नाहीत, नागरी सुविधा कामे यापूर्वी अन्य कोणत्याही योजनेतून करण्यात आलेली नाहीत. अथवा सदरची कामे अन्य योजनेत समाविष्ट नाहीत, तसेच या कामांवर यापूर्वी खर्च करण्यात आलेला नाही, याची संबंधित विभागीय आयुक्त/जिल्हाधिकारी/मुख्य कार्यकारी अधिकारी, कार्यकारी अभियंता (बांधकाम), सार्वजनिक बांधकाम विभाग तसेच संबंधित यंत्रणांनी दक्षता घ्यावी.

८) प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांचा उचित दर्जा राखला जाईल, याची संबंधित अधिक्षक अभियंता व संबंधित कार्यकारी अभियंता यांनी योग्य ती दक्षता घ्यावी.

९) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम, देगलूर, जि.नांदेड यांनी प्रस्तुत प्रशासकीय मान्यता आदेशांतील अटींची पूर्तता पूर्ण करुन प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामे तात्काळ सुरु करावीत.

२. **निविदा प्रक्रिया व कार्यारंभ आदेश** :- कार्यकारी अभियंता (बांधकाम), सार्वजनिक बांधकाम विभाग, देगलूर, जि.नांदेड यांनी प्रस्तुत प्रशासकीय मान्यता आदेशातील अटींची पुर्तता करुन प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांची निविदा प्रक्रिया तात्काळ सुरु करावी. तसेच निविदा प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर निविदा प्राप्त कामांसाठीचे कार्यारंभ आदेश देऊन नागरी सुविधा कामे तात्काळ सुरु करावीत.

**३.** संबंधित कार्यान्वयन यंत्रणेच्या कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम, देगलूर जि. नांदेड यांनी उपरोक्त परि.२ मध्ये नमूद केल्यानूसार सुरु करण्यात आलेल्या नागरी सुविधाकामांच्या प्रगतीचा अहवाल / खर्चाच्या प्रगतीचा अहवाल इ. सादर करुन कामाच्या पगतीनूसार सन २०२३-२४ या वित्तीय वर्षाच्या कालावधीत सदर कामे पूर्ण करण्याच्या नियोजनानूसार खर्च “मागणी क्रमांक सी-६, २२४५-नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य-०२ पूर, चक्रीवादळे इत्यादि, १०१, अनुग्रह सहाय्य (९२) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकाव्यतिरिक्त खर्च, (९२)(०४) पुरामुळे बाधित झालेल्या व्यक्तिंच्या पुनर्वसनाकरिता रस्ते, पाणी पुरवठा, शाळा चावडी, विदयुत पुरवठा, नागरी सुविधावरील खर्च (अनिवार्य) (दत्तमत) (२२४५ २२२९) ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर)” या लेखाशिर्षाखाली आवश्यक निधीची मागणी शासनास सादर करावी. त्या अनुषंगाने सन

२०२३-२४ या वित्तीय वर्षाच्या मंजूर व उपलब्ध तरतुदीतून आवश्यक तेवढा निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर विभागीय आयुक्त, संभाजीनगर (औरंगाबाद) यांच्यामार्फत संबंधित कार्यान्वयन यंत्रणेस उपलब्ध करुन येईल. सदरच्या सुविधा कामांसाठी वितरीत करण्यात आलेल्या निधीच्या अनुषंगाने प्रलंबित उपयोजन प्रमाणपत्रे (Utilization Certificates) प्राथम्याने सादर करावीत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०५०४१४४७२५४६१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

CHULARAM R NIKHARE

Digitally signed by CHULARAM R NIKHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=888a9197d5a4831c7e5ef0c4328259521ba94feaafdffbadf353be3592552a31, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=E37123E923CF43F99F06B54384FF491E5F703F14D653B5A59D47EAB1F73E2597, cn=CHULARAM R NIKHARE
Date: 2023.05.10 15:43:11 +05'30'

**( चु. रा. निखारे )**

कार्यासन अधिकारी, महसुल व वन विभाग

**प्रत,**

१) विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रण अधिकारी (पुनर्वसन) औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
२) उप आयुक्त (पुनर्वसन ), औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
३) जिल्हाधिकारी तथा पुनर्वसन उपसंचालक, नांदेड
४) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, देगलूर, जि.नांदेड
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई -१ / नागपूर-२ (२ प्रतीत)
६) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई -१ / नागपूर-२ (२ प्रतीत)
७) जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड
८) वित्त विभाग,कार्यासन व्यय ९/ व्यय १०/ अर्थसंकल्प ६, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
९) कार्यासन अधिकारी, कार्या. ब-१/ कार्यासन -पी.ए.सी., महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
१०) निवड नस्ती, कार्यासन र-१२, महसूल व वन विभाग,मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.